**मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पूरपुनर्वसित गावठाणातील नागरी सुविधा कामांना निधी मंजूर करणेबाबत...**

महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आव्यप्र-२०१८/प्र.क्र.४०/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २१/०८/२०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरपीअे-१०९१/१७८६/प्र.क्र.२५२/र-१, दि.४.१२.१९९१
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आरपीए-२००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आव्यप्र-२०११/प्र.क्र.९७/आव्यप्र-२, दि.२.९.२०१४
४) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे कार्यालयीन आदेश क्र.उपआ/ भूस२/ पुनर्व/ कावि/९७७/ २०१६, दि.६.४.२०१६
५) जिल्हाधिकारी, अमरावती यांचे पत्र क्र.कक्ष २७/अ.का./पुर-पुनर्व/कावि/ १४६०/२०१८, दि.२४.५.२०१८
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.आव्यप्र-२०१८/प्र.क्र.४०/र-१२, दिनांक २१.८.२०१८

**प्रस्तावना -**

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय दि.४.१२.१९९१ नुसार पुनर्वसित किंवा पुनर्वसनासाठी निर्माण केलेल्या गावठाणात नागरी सुविधा पुनविण्याच्यासंदर्भात वैयक्तिक कामांना रुपये १०.०० लाखापर्यंत प्रशासकीय मंजूरी देण्याचे अधिकार विभागीय आयुक्तांना प्रदान करण्यात आले आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.१.८.२००९ अन्वये पुनर्वसित/ विस्तारित गावठाणामध्ये नागरी सुविधा पुरविण्यासाठी मानके निश्चित करण्यात आले आहे. संदर्भ क्र.४ नुसार, विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या दि.६.४.२०१६ रोजी कार्यालयीन आदेशान्वये, मौजा आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पुरपुनर्वसित गावठाणामध्ये सिमेंट कॉंक्रीट नालीचे बांधकाम (१ काम) व सिमेंट कॉंक्रीट रस्त्याचे बांधकाम (२ कामे) अशा एकूण ३ कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्र.६ येथील शासन निर्णय दि.२१.८.२०१८ अन्वये सिमेंट कॉंक्रीट रस्त्याच्या बांधकामास (२ कामे) कार्योत्तर मंजूरी प्रदान केली आहे. सदर तीनही कामे पूर्ण करण्यात आली असून, कामांची देयके अदा करण्यासाठी जिल्हाधिकारी, अमरावती यांनी संदर्भ क्र.५ येथील दि.२४.५.२०१८ अन्वये निधी मागणी करण्यात आली आहे. त्यानुसार मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पूरपुनर्वसित गावातील नागरी सुविधा कामांना निधी वितरित करण्याची बाब प्रस्तुत नस्तीवर विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पूरपुनर्वसित गावठाणातील नागरी सुविधा कामांसाठी मागणी करण्यात आलेला एकूण रू. २४,५४,३४०/- (रुपये चोवीस लक्ष चौपन्न हजार तीनशे चाळीस फक्त) निधी सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२. तदनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पूरपुनर्वसित गावठाणातील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.२४,५४,३४०/- (रुपये चोवीस लक्ष चौपन्न हजार तीनशे चाळीस फक्त ) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, अमरावती यांच्यामार्फत जिल्हाधिकारी, अमरावती यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) नागरी सुविधा कामांची प्रशासकीय मान्यता, स्विकृत निविदा किंमत, काम पूर्ण केल्याची खात्री, कामाच्या मोजमापानुसार देय होणारी रक्कम इ. बाबी विचारात घेऊन अनुज्ञेय देयकाची रक्कम अदा होईल, याची जबाबदारी जिल्हाधिकारी, अमरावती यांची राहील.

२) जिल्हाधिकारी, अमरावती यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधीमधून अनुज्ञेय देयकाची रक्कम संबंधित संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावी.

३) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, जिल्हाधिकारी, अमरावती यांना सत्वर सादर करावा.

४) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची संबंधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

५) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

६) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५२२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत प्राप्त झालेला कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते ) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०४) पुरामुळे बाधीत झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा, चावडी, विद्युत पुरवठा, नागरी सुविधावरील खर्च (अनिवार्य) (दत्तमत) (२२४५ २२२९) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षातर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

७) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

८) संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत.

९) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१८-२०१९ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२११७४२२३१४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rahul Vijay Kulkarni

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, cn=Rahul Vijay Kulkarni
Date: 2018.08.21 17:44:23 +05'30'

**( राहुल विजय कुलकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) अमरावती विभाग, अमरावती.
२. उप आयुक्त (पुनर्वसन), अमरावती.
३. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अमरावती.
४. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अचलपूर.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-६, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. महसूल व वन विभाग, कार्यासन ब-१/पी.ए.सी.,मंत्रालय, मुंबई ३२.
११. निवडनस्ती कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र: आव्यप्र-२०१८/प्र.क्र.४०/र-१२, दि.२१/०८/२०१८ सोबतचे विवरणपत्र

मौजे आखातवाडा, ता.चांदूर बाजार, जि.अमरावती या पूरपुनर्वसित गावातील नागरी सुविधा कामांसाठी वितरीत निधीचा तपशील.

| अ.क्र | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | अंदाजपत्रकीय रक्कम रू. |
|---|---|---|---|
| १ | आखातवाडा | सिमेंट कॉंक्रीट नालीचे बांधकाम | ५,००,०००/- |
| २ | आखातवाडा | सिमेंट कॉंक्रीट रस्त्याचे बांधकाम भाग-१ | ९,८१,६८०/- |
| ३ | आखातवाडा | सिमेंट कॉंक्रीट रस्त्याचे बांधकाम भाग-२ | ९,७२,६६०/- |
| | | एकूण | २४,५४,३४०/- |

Rahul Vijay Kulkarni

Digitally signed by Rahul Vijay Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=019d1a40755cacf50cb371c432c67afaec7da5aad928d966ad4270c6a4f1ac39, cn=Rahul Vijay Kulkarni
Date: 2018.08.21 17:45:15 +05'30'

( राहुल विजय कुलकर्णी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

******